**खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेणाऱ्या आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र. टीईएम -२०१४/प्र.क्र.९०/तांशि-४,**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,

दिनांक : २० मार्च, २०१५.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.टीईएम -२०१३/प्र. क्र. १९२/तांशि-४, दिनांक ०३.०३.२०१४.

२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. २अ/एडीएम/शुल्क प्रतिपूर्ती/ २०१४/८१४, दिनांक ११.०४.२०१४.

<u>प्रस्तावना</u> :

शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, कृषि विभाग, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय आणि मत्स्यव्यवसाय विभाग या विभागांच्या अधिपत्याखाली असणाऱ्या व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित संस्थांमध्ये प्रवेश घेणाऱ्या सामाजिक मागास व आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांतील विद्यार्थी केवळ निधीअभावी व्यावसायिक अभ्यासक्रमांपासून वंचित राहू नये म्हणून, एक सामाजिक बांधिलकी व घटनात्मक उत्तरदायित्व म्हणून, राज्य शासनाने फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ पासून घेतलेला आहे. सदरहू निर्णय शैक्षणिक वर्ष २००७-०८, २००८-०९, २००९-१०, २०१०-११, २०११-१२, २०१२-१३ व २०१३-१४ मध्ये कायम ठेवण्यात आलेला आहे. आता सदरहू योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये आहे त्याच स्वरुपात एका वर्षासाठी सुरु ठेवण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयानुसार अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग व इतर मागास वर्ग या समाज घटकांतील विद्यार्थ्यांची फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश सामाजिक न्याय विभागामार्फत आणि अनुसूचित जमाती या घटकातील विद्यार्थ्यांसाठी फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश आदिवासी विकास विभागाकडून तसेच आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या फी प्रतिपूर्तीचे आदेश त्या त्या प्रशासकीय विभागांमार्फत निर्गमित करणे अपेक्षित आहे. त्या अनुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेणाऱ्या आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांची शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये आहे त्याच स्वरुपात एका वर्षासाठी सुरु ठेवण्याची बाब या विभागाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन निर्णय** :

राज्यातील उच्च व तंत्र शिक्षण विभागांतर्गत व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित महाविद्यालयात प्रवेश घेतलेल्या आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी सुरु असलेली शिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ या एका वर्षासाठी आहे त्याच स्वरुपात राबविण्यासाठी खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

(१) खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थामध्ये पुढील व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेणाऱ्या आर्थिकदृष्ट्या मागास वर्गासाठी शैक्षणिक वर्ष २००६-०७, २००७-०८, २००८-०९, २००९-१०, २०१०-११, २०११-१२, २०१२-१३ व २०१३-१४ या वर्षी सुरु ठेवण्यात आलेली शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीची योजना शैक्षणिक वर्ष २०१४-१५ मध्ये आहे त्याच स्वरुपात चालू राहील.

या योजनेमध्ये खालील अभ्यासक्रमांचा समावेश राहील :-

| **पदविका** | **पदवी** | **पदव्युत्तर पदवी** |
|---|---|---|
| अभियांत्रिकी | अभियांत्रिकी | एम.बी.ए./एम.एम.एस. |
| औषधनिर्माणशास्त्र | औषधनिर्माणशास्त्र | एम.सी.ए. |
| एचएमसीटी | एचएमसीटी | -- |
| -- | वास्तुशास्त्र | -- |

(२) सदरहू योजनेचा लाभ घेण्यासाठी आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या पालकांचे वार्षिक आर्थिक उत्पन्न रु. १ लक्ष रकमेच्या आत असणे आवश्यक राहील.

(३) आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना ५० टक्के शिक्षण शुल्काची प्रतिपूर्ती शासनामार्फत करण्यात येईल.

(४) सदरहू योजनेचा लाभ शैक्षणिक वर्ष २००६-०७,२००७-०८,२००८-०९, २००९-१०, २०१०-११, २०११-१२, २०१२-१३ व २०१३-१४ मध्ये प्रवेशित विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमांच्या पूर्ण कालावधीपर्यंत लागू राहील.

(५) तंत्र शिक्षणाशी निगडीत पदविका, पदवी आणि पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमां- साठी ज्या विद्यार्थ्यांनी शासनाच्या केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे (CAP) प्रवेश घेतलेला आहे, अशा विद्यार्थ्यांना ही योजना लागू राहील.

(६) सदरहू योजनेचा लाभ एआयईईई कोट्यातून प्रवेश घेणाऱ्या महाराष्ट्र राज्यातील मागासवर्गीय उमेदवारांनाही लागू राहील.

(७) अभिमत विद्यापीठांना ही सवलत लागू राहणार नाही.

(८) अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांना ही सवलत लागू राहणार नाही

(९) शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्तीचे सदर धोरण हे २०१४-१५ या शैक्षणिक वर्षाकरिता लागू राहील .

(१०) आर्थिक मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र हे संबंधित तहसिलदार यांचे असावे.

(११) आर्थिकदृष्टया मागास विद्यार्थ्यांबाबत सदर योजना चालू ठेवण्यासाठी या विभागाकडून आवश्यक रकमेची तरतूद करण्यात येईल.

(१२) तंत्र शिक्षणाशी निगडीत वरील मुद्दा क्र. १ येथील आर्थिक दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्क प्रतिपूर्तीचा खर्च, मुख्य लेखाशिर्ष " २२०३-तंत्र शिक्षण, १०७ शिष्यवृत्त्या, (००)(०६) ज्यांचे किंवा ज्यांच्या पालकांचे उत्पन्न रुपये १.०० लाखापेक्षा अधिक नाही, अशा व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या विद्यार्थ्यांना ५० टक्के फी माफी (२२०३०७४८), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १६८/व्यय-५, दिनांक ०९.०३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२०१६५४५९७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Kiran N Patil
Digitally signed by Dr. Kiran N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dr. Kiran N Patil
Date: 2015.03.26 17:40:37 +05'30'

**( डॉ. किरण पाटील )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. अपर मुख्य सचिव, (कृषि) कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (पदुम), कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे .
१३. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. आयुक्त, आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१७. संचालक, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिद्धीसाठी)
२०. अप्पर आयुक्त, आदिवासी विकास (सर्व).
२१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
२४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२६. सर्व संबंधित मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
२७. अवर सचिव, (तांशि-३/तांशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२८. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे वरीष्ठ स्वीय सहायक.
३०. निवड नस्ती ( कार्यासन - तांशि-४).